वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेली १३७ अस्थायी पदे सन २०२५-२०२६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०३.२५/प्र.क्र.८९/भाग-७/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०३.०४.२०२५

**वाचावे :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संक्र-१००१/प्र.क्र.२९/(भाग-६)/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०७.२००४.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक्र-१००१/ प्र.क्र.२९ /(भाग-७)/ २००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०९.२००४.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक/१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४.१०.२००४.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
५. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक २१.०९.२०२१
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०४.२४/प्र.क्र.८२/फ-१, दिनांक १०.०४.२०२४.
७. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०४.२४/प्र.क्र.८२/फ-१, दिनांक २५.०९.२०२३.
८. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.०३(२४-२५)/५९८/२५-२६, दिनांक १८.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या १३७ अस्थायी पदांना सन २०२४-२५ मध्ये संदर्भ क्रमांक ६ व ७ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. आता, संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रान्वये उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या १३७ अस्थायी पदांना सन २०२५-२०२६ मध्ये दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक २८.०२.२०२६ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ

देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ८ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या १३७ अस्थायी पदांना सन २०२५-२६ मध्ये दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या १३७ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च "२४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीव, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६)" या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०३१८०९१४७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY CHANDRAKANT DHAGE

Digitally signed by UDAY CHANDRAKANT DHAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=d50c7e8b1126d276bbe49105f9d24fff67dc9032e4afab15f5d0d94a0ea6cf5a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=097E903F6E5707A0A9A3CDAEBE40C9235E8FDA1EE2C8C4EA7713D6497937DCED, cn=UDAY CHANDRAKANT DHAGE
Date: 2025.04.03 18:10:24 +05'30'

**(उदय ढगे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

प्रति,

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक, प्रादेशिक (सर्व). / वनसंरक्षक, प्रादेशिक (सर्व).
७. उपवनसंरक्षक,यावल/जळगांव/अकोट/धारणी/नांदेड/पुसद/पुणे/सावंतवाडी/औरंगाबाद/ नागपूर/वर्धा/अहमदनगर/अलीबाग/कोल्हापूर/ताडोबा राष्ट्रीय उद्यान, चंद्रपूर.
८. उप विभागीय वन अधिकारी, भोर/सांगली.
९. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), म.रा.मुंबई/नागपूर.
१०. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*********

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.२५/प्र.क्र.८९/फ-१,
दिनांक: ०३.०४.२०२५ सोबतचे विवरणपत्र.
(दिनांक:- ०१.०३.२०२५ ते दिनांक:- ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)

| **अ.क्र** | **पद** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) | १ |
| २ | वनसंरक्षक | १ |
| ३ | वनपाल | २० |
| ४ | वनरक्षक | ७४ |
| ५ | शिपाई | ३ |
| ६ | खानसामा-नि-चौकीदार | २ |
| ७ | सफाई कामगार | १ |
| ८ | माळी | १६ |
| ९ | हत्यारी पोलीस शिपाई | २ |
| १० | वाहन चालक | ९ |
| ११ | स्वच्छक | १ |
| १२ | पहारेकरी | ६ |
| १३ | वनपाल (गाईड) | १ |
| | एकूण | १३७ |

**********